केंद्र शासन पुरस्कृत ग्रामन्यायालय योजनेकरिता कार्यक्रमातंर्गत केंद्र शासन व राज्य शासन यांचे स्वतंत्र लेखाशीर्ष खाते उघडणेबाबत ---------------------------

# महाराष्ट्र शासन
## विधि व न्याय विभाग

**शासन निर्णय क्रमांकः ग्रामन्या- २०२१/प्र.क्र.१५१/का.१२**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
तारीख: ०१ एप्रिल, २०२२

**वाचा :-**

१ शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.बीजीटी-२०.१०/प्र.क्र.६६/अर्थसंकल्प-२, दिनांक १०.०८.२०१०

२ शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र.संकीर्ण-२०२१/प्र.क्र.३५/कोषा प्रशा-४, दिनांक ०१.०७.२०२१

३ प्रधान महालेखाकार यांचे कार्यालय (लेखा व हकदारी)-१, महाराष्ट्र यांचे पत्र सं:ख.वि/चा-१ विधि व न्याय विभागा, यू ओ आर- १४८/२०२१-२२/७२४, दिनांक १४.०३.२०२२

**प्रस्तावना :-**

केंद्र पुरस्कृत योजनांच्या निधीचे परिणामकारक व्यवस्थापन करण्याच्या तसेच निधी विनियोगाच्या प्रक्रियेत अधिक परिणामकारता आणण्याच्या दृष्टीने केंद्र शासन ज्ञापन, दिनांक २३.०३.२०२१ अन्वये सुधारित कार्यपध्दतीचा अवलंब करण्याचे निर्देश दिले आहेत. त्यानुसार केंद्र पुरस्कृत योजनांचे निधी वितरण व विनियोग व्यवस्थापन (PFMS) करण्यासंदर्भात वित्त विभाग, शासन परिपत्रक दिनांक ०१.०७.२०२१ अन्वये सुधारित सूचना देण्यात आल्या आहेत. सदर शासन परिपत्रकामधील जोडपत्र "अ" मधील सुधारित सूचना क्रमांक ११ अन्वये केंद्र शासन व राज्य शासन यांच्या स्वतंत्र budget lines असणे आवश्यक आहे. त्यास अनुलक्षून केंद्र शासन पुरस्कृत ग्रामन्यायालय योजनेकरिता कार्यक्रमांतर्गत केंद्र शासन व राज्य शासन यांचे स्वतंत्र लेखाशीर्ष खाते उघडण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

केंद्र शासन पुरस्कृत ग्रामन्यायालय योजनेकरिता कार्यक्रमातंर्गत केंद्र शासन व राज्य शासन यांचे स्वतंत्र लेखाशीर्ष खाते खालीलप्रमाणे उघडण्यास मान्यता देण्यात येत आहे :

Grant No. J-01

| | | |
|---|---|---|
| 2014 | - | Administration of Justice |
| 105 | - | Civil and Sessions Courts |
| (02) | - | Civil and Sessions Judges |

(02) (03) – Establishment of Gramanyalayas as per Gramanyalayas Act, 2008 (Central share)

(02) (04) – Establishment of Gramanyalayas as per Gramanyalayas Act, 2008 (State share)

सदर लेखाशिर्षातर्गत दोन अंकी संकेतांक उद्दिष्टशिर्षे ही संदर्भ क्रमांक १ येथील शासन निर्णय दिनांक १०.०८.२०१० अन्वये परिशिष्ट अ मधील उद्दिष्टशिर्षांच्या सूचीनुसार असतील.

२. सदर शासन निर्णय नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ०८/१४४३, दिनांक २१.०१.२०२२ अन्वये, वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक १२३/२०२२/व्यय-५, दिनांक २५.०१.२०२२ अन्वये व महालेखापाल १ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई यांच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक सं:ख.वि/चा-१ विधि व न्याय विभाग, यू ओ आर- १४८/२०२१-२२/७२४, दिनांक १४.०३.२०२२ अन्वये व त्यांच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०४०११५४१४३९०१२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

BHAGYASHREE
RAJENDRA BHAIDKAR

Digitally signed by BHAGYASHREE RAJENDRA BHAIDKAR
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d567849462918ceb7579bb2b56247e927c039bbdf028022a8b9ce837a7c854bb, serialNumber=fb84fefefe4ee219c1bc35b35201c14eab0903e8194a7413a74eed93f32afdb0, cn=BHAGYASHREE RAJENDRA BHAIDKAR
Date: 2022.04.01 15:43:49 +05'30'

**(भाग्यश्री भाईडकर)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.महाप्रबंधक, मा.उच्च न्यायालय मुंबई,
२. सर्व प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश, जिल्हा व सत्र न्यायालये ,
३. सर्व न्यायाधिकारी, ग्राम न्यायालये
४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र -१/२, मुंबई / नागपूर,
५. महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र -१/२, मुंबई / नागपूर,
६. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
७. अवर सचिव (व्यय-५/अर्थसं-११), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
८. कक्ष अधिकारी (का.१४४३), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
९. कक्ष अधिकारी, १३/२३/२४/२५, विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई
१०. निवडनस्ती (का.१२)